**महाड, जि. रायगड येथील पूर नियंत्रणासाठी सावित्री नदीतील गाळ काढणाऱ्या सयंत्रासाठी इंधन खर्च उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन)**
**शासन निर्णय क्र. आव्यप्र-२०२२/प्र.क्र.३१८/आव्यप्र-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दि. ०९ मे, २०२३

**वाचा**:- १) जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण, रायगड यांचे पत्र क्र.साशा/कार्या-१/ब-५/जि.आ.व्य.प्रा./महाड पूर/निधी/५९६७५/२०२२-२३, दि. २७ डिसेंबर, २०२२.
२) जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाचा ठराव दि.३ मार्च २०२३ चा ठराव
३) राज्य कार्यकारी समितीच्या दि. २४ जानेवारी, २०२३ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
४) शासन निर्णय क्र. आव्यप्र-२०२२/प्र.क्र.०३/आव्यप्र-१, दि.०८ जून,२०२२

**प्रस्तावना**:-

सन २०२२ मध्ये महाड, जि. रायगड येथील पुरनियंत्रणासाठी सावित्री नदीतील गाळ काढण्याकरिता रु. ९.५५ कोटी निधी उपलब्ध करुन दिला होता. सदर निधीतून झालेल्या कामामूळे पुर पातळीमध्ये लक्षणीय घट झाली असल्याचे जिल्हाधिकारी यांच्या अहवालात नमुद केले आहे. तसेच महाड येथील पूर नियंत्रणासाठी महाड तालुक्यातील ५८ गावे व पोलादपूर तालुक्यातील १९ गावांतील सावित्री नदीतील अंदाजित २४.०० लक्ष घ.मी. इतका गाळ काढण्यासाठी इंधन खर्च उपलब्ध करुन देण्यासाठी रु. ३१.११ कोटी निधीची मागणी केलेली आहे .

जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण, रायगड यांच्या दि. ३ मार्च, २०२३ च्या ठरावात Non C.R.Z. क्षेत्रात पर्यावरण, वन व जलवायू परिवर्तन मंत्रालय, भारत सरकार यांच्याकडील राजपत्र क्र. CG-DL-E २८०३२०२०-२१८९४८, दि.२८.०३.२०२० मधील परिशिष्ट क्र.९ मधील अट क्र.७ प्रमाणे Dredgeing & desilting of dams, reservoirsweirs, barrages river &cannel for purpose of their maintenance upkeen & disaster management असे नमूद करण्यात आले आहे.त्यानुसार या कामास पर्यावरण विभागाची आवश्यकता नाही असे नमूद केले आहे. तथापि जलसंपदा विभागाकडून करण्यात येत आहे. याची केंद्र शासनासोबत पत्रव्यवहार केला असल्याचे त्यांनी दिलेल्या प्रस्तावात नमुद केले आहे.

राज्य कार्यकारी समितीने दि. २४ जानेवारी, २०२३ रोजी झालेल्या बैठकीमध्ये या कामाच्या रु. ३१.११ कोटीच्या प्रस्तावास मान्यता दिलेली आहे सदर काम पावसाळ्यापूर्वी करावयाचे असल्याने जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण, रायगड यांना या कामाकरिता निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाड शहरातील पूर नियंत्रणासाठी सावित्री नदीत जमा झालेला गाळ काढणे ही आपत्ती सौम्यीकरणाची बाब असल्याने सावित्री नदीमधील गाळ काढण्यासाठी जलसंपदा विभागाच्या सयंत्रासाठी इंधन खर्च म्हणून कामाची तातडी लक्षात घेता पहिला टप्पा म्हणून रु. ५,००,००,०००/- (रुपये पाच कोटी फक्त) इतका निधी या कामासाठी आवश्यक त्या सयंत्रणांच्या परवानग्या जिल्हाधिकारी, रायगड यांनी प्राप्त करुन घेण्याच्या अटीच्या अधिन राहून जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण, रायगड यांना वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. या कामी होणारा खर्च मागणी क्र. सी-६, २२४५, नैसर्गिक आपत्ती च्या निवारणासाठी सहाय्य, ९१ राज्य आपत्ती निधीच्या मानकानुसार खर्च (९१)(०३) राष्ट्रीय आपत्ती सौम्यीकरण निधीतून सहाय्य प्राधिकरणाचे कार्यालय स्थापन करणे व फर्निचर व साधनसामुग्रीसह सुसज्जीकरण करणे (२२४५ ४२३२) ३१ - सहायक अनुदाने (सशर्त) या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाकरिता मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर (BDS) सदर निधी विभागीय आयुक्त, कोकण यांना वितरीत करण्यात येत असून तो जिल्हाधिकारी, रायगड यांना वितरीत करण्यात यावा. कामाचा विनियोग झाल्यानंतर त्याचे प्रमाणपत्र जिल्हाधिकारी, रायगड यांनी शासनास सादर करावे. किमान ७५% रकमेचा विनियोग झाल्यानंतर पुढील हप्त्याची रक्कम वितरीत करण्यात येईल.

सदर आदेश वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग-पहिला,उपविभाग-तीन, अनुक्रमांक-७, परिच्छेद-२७ (२) नुसार प्रशासकीय विभागास दिलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०५०९१६०४२५६४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्याचे राज्यपाल यांच्या आदेशाने व नावाने,

HITENDRA YADAORAO DUFARE

Digitally signed by HITENDRA YADAORAO DUFARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=1170c73752038d1c4f8b3a8c1729f3f55bd8bd13206eed4aead71a63b3f1dcee, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=02BBA6FFE202C222698F7E91A562A124096291549EBA836EE89EC11CB9F688D5, cn=HITENDRA YADAORAO DUFARE
Date: 2023.05.09 16:04:39 +05'30'

**(हि.या.दुफारे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत -**

१) प्रधान सचिव, आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन यांचे स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई.

२) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, बेलापूर, नवी मुंबई.
३) वित्तीय सल्लागार व सह सचिव, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई.
४) जिल्हाधिकारी, रायगड.
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), ½, मुंबई.
६) महालेखापाल (लेखापरिक्षा), ½, मुंबई.
७) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड.
९) निवड नस्ती/आव्यप्र-१.